महाराष्ट्रातील व्याघ्र प्रकल्पांमध्ये विद्युत वाहनांचा (Electric Vehicle) वापर करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
**महसूल व वन विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक : - डब्ल्यूएलपी-०६.१८/प्र.क्र.२३९/फ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २२ नोव्हेंबर, २०१८

वाचा :-

१. मंत्रालय पर्यावरण व वने (राष्ट्रीय व्याघ्र संवर्धन प्राधिकरण), नवी दिल्ली, अधिसूचना क्र. १५-३१/२०१२ दिनांक :- १५.१०.२०१२.
२. शासन निर्णय उद्योग, उर्जा आणि कामगार विभाग, क्र. प्र.क्र.१८८/ उद्योग-२/ दिनांक १४.०२.२०१८.

विद्युत वाहन (Electric Vehicle) तंत्रज्ञान हे यापुढील कालावधीतील जागतिक स्तरावर दळणवळणाच्या क्षेत्रातील आमुलाग्र बदल घडवून आणणारी बाब आहे. विद्युत वाहनामुळे (Electric Vehicle) जागतिक स्तरावर व देशांतर्गत पेट्रोलियम पदार्थावरील अवलंबित्व कमी होईल, पर्यायाने कार्बन डायऑक्साईडचे उत्सर्जन कमी झाल्यास प्रदुषण कमी होण्यास मदत होणार आहे. याशिवाय पर्यावरण पुरक स्वस्त इंधन खर्च, तसेच वाहनांची देखभाल कमी होणे इत्यादीबाबत मदत होणार आहे. संयुक्त राष्ट्र संघटना (UNO) चा सन २०३० पर्यंत विद्युत वाहनाला (Electric Vehicle) उत्तेजन देण्याचा उद्देश आहे. यासाठी भारत सरकारने सन २०३० पर्यंत "इलेक्ट्रीक व्हेईकल नेशन" घडविण्याचे योजिले आहे.

"नॅशनल इलेक्ट्रीक मोबलीटी प्लॅन"(NEMMP) अंतर्गत भारत सरकारने सन २०२० पर्यंत ६० लाख इलेक्ट्रीक व हायब्रीड वाहने रस्त्यावर उतरविण्याचा मानस ठेवला आहे. यासाठी Faster Adoption & Manufacturing of (Hybrid) & Electric Vehicles (FAME) ही योजना केंद्र शासनाने सुरू केली आहे. सदर योजने अंतर्गत१२० दशलक्ष बॅरल इंधन बचतीचे व ४० लाख टन कार्बन डाय ऑक्साईड उत्सर्जन कमी करण्याचे उद्दिष्ट ठेवले आहे.

महाराष्ट्र राज्य हे जागतिक स्तरावर विद्युत वाहन (Electric Vehicle) व त्यांच्या सुटया भागांचे उत्पादन आणि जास्तीत जास्त विद्युत वाहन (Electric Vehicle) वापर करणारे स्पर्धात्मक राज्य बनविण्याकरीता महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्राचे इलेक्ट्रीक व्हेईकल प्रोत्साहन धोरण-२०१८ जाहीर केले आहे. राष्ट्रीय व्याघ्र संवर्धन प्राधिकरणाने त्यांच्या मार्गदर्शक सुचनांमध्ये सुद्धा व्याघ्र प्रकल्पांमध्ये पर्यटन आणि सफारीसाठी विद्युत वाहनांचा (Electric Vehicle) वापर करण्याची शिफारस केली आहे.

महाराष्ट्राचे इलेक्ट्रीक व्हेईकल प्रोत्साहन धोरण-२०१८ प्रमाणे व पर्यावरण पुरक पर्यटन राबविण्याकरिता उपरोक्त नमुद पार्श्वभुमीच्या आधारे महाराष्ट्र राज्यातील व्याघ्र प्रकल्पांमध्ये पर्यटनासाठी खालील अटींच्या अधीन राहून विद्युत वाहनाचा (Electric Vehicle) वापर करण्यात यावा:-

१. प्रादेशिक परिवहन अधिकारी (RTO) यांच्याकडून मान्यता असलेले विद्युत वाहन (Electric Vehicle) ज्या ठिकाणी उपलब्ध असतील अशा ठिकाणी सफारीसाठी

नोंदणीकृत जुन्या पेट्रोल / डिझेल वाहनांऐवजी विद्युत वाहन (Electric Vehicle) वापरण्यात यावे. तथापी सदर कार्यवाही करतांना राष्ट्रीय व्याघ्र संवर्धन प्राधिकरण यांनी मंजूर केलेल्या धारण क्षमता (carrying capacity) मर्यादेचे उल्लंघन होणार नाही याची दक्षता घ्यावी.

२. सद्यस्थितीत ज्या ठिकाणी राष्ट्रीय व्याघ्र संवर्धन प्राधिकरण यांनी मंजूर केलेल्या धारण क्षमतेपेक्षा कमी वाहने पर्यटनासाठी नोंदविलेली आहेत अशा ठिकाणी प्रथम प्राधान्याने नव्या विद्युत वाहनांची (Electric Vehicle) सफारीसाठी नोंदणी करण्यात यावी. सदर प्रक्रियेत व्याघ्र प्रकल्पांच्या बफर क्षेत्रातील व संरक्षित क्षेत्रातून पुनर्वसित झालेल्या गावातील ग्रामस्थांच्या मालकीचे तसेच त्यांच्याकडून चालविण्यात येणा-या विद्युत वाहनांना (Electric Vehicle) प्रथम प्राधान्य देण्यात यावे.

३. पर्यटकांच्या सुरक्षेच्या दृष्टीने विद्युत वाहन (Electric Vehicle) संरक्षित क्षेत्रातील विद्युत वाहनांकरीता सुयोग्य असलेल्या भुप्रदेशातच वापरण्यात यावे.

४. पर्यटनाकरिता व्याघ्र प्रकल्पांत विद्युत वाहनाचा (Electric Vehicle) वापर करताना राष्ट्रीय व्याघ्र संवर्धन प्राधिकरणाव्दारे मंजुर व्याघ्र संवर्धन योजने (Tiger Conservation Plan) अंतर्गत नमुद सर्व तरतुदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

५. संबंधित व्याघ्र संवर्धन प्रतिष्ठान पर्यटनामध्ये पारंपारिक वाहनांऐवजी विद्युत वाहनाचा (Electric Vehicle) वापर मोठया प्रमाणात होण्याच्या दृष्टीने विद्युत वाहनाच्या (Electric Vehicle) प्रवेश शुल्कांमध्ये ५० टक्क्यापर्यंत सवलत देण्याबाबत निर्णय घेतील.

व्याघ्र प्रकल्पांतील संबंधित क्षेत्र संचालक यांनी वरील मार्गदर्शक सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी तात्काळ प्रभावाने करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेताक २०१८११२२१४४३१५८६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2018.11.22 14:49:34 +05'30'

**(सुजय दोडल)**
सहसचिव (वने)
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय मुंबई .
२. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा. राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) , पश्चिम मुंबई / पुर्व नागपूर.
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य प्राणी संग्रहालय प्राधिकरण, नागपूर.
९. मुख्य वनसंरक्षक व क्षेत्रसंचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.
१०.मुख्य वनसंरक्षक व क्षेत्रसंचालक, सहयाद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर.
११.वनसंरक्षक व क्षेत्रसंचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर.
१२.वनसंरक्षक व क्षेत्रसंचालक, नवेगाव - नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया.
१३. वनसंरक्षक व क्षेत्रसंचालक, पेंच व बोर व्याघ्र प्रकल्प, नागपूर.
१४. वन कक्षातील सर्व कार्यासने, महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवड नस्ती ).